संरक्षित वनांचे क्षेत्रालगतच्या गावातील सर्वसाधारण जातीच्या लाभार्थ्यांना कुकींग गॅस, बायो गॅस, दुभत्या जनावरांसाठी अनुदान व वृक्ष लागवडीच्या संरक्षणासाठी प्रोत्साहन देण्याकरिता अनुदानाचे वाटप.
सन २०१५-१६.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१५/प्र.क्र.१९६/फ-२
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १७ जुलै, २०१५

वाचा :१) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. एफडीएम-२०१२/प्र.क्र.४/फ-२, दि.१०.०७.२०१२

२) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. एफडीएम-२०१४/प्र.क्र.१७७/फ-२, दि.११.०९.२०१४

३) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. एफडीएम-२०१४/प्र.क्र.१७७/फ-२, दि.०२.०२.२०१५

४) महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. एफडीएम-२०१४/प्र.क्र.१७७/फ-२, दि.१२.०२.२०१५

५) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.०४.२०१५.

६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/यो/ इए/नबाप्र/प्र.क्र.१२(१५-१६)/६६७, दि.०८.०७.२०१५.

प्रस्तावना :-

संरक्षित वनालगतच्या संयुक्त वन व्यवस्थापन समितीच्या सदस्यांना/ ग्रामस्थांना सवलतीच्या दराने बायोगॅस/ स्वयंपाक गॅस पुरवठा, दुभत्या जनावरांसाठी अनुदान व वृक्ष लागवडीच्या संरक्षणासाठी प्रोत्साहन देण्याबाबतची योजना संदर्भ क्र. १ वरील दि.१०.०७.२०१२ च्या शासन निर्णयान्वये राबविण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

२. याअनुषंगाने, सन २०१४-१५ मध्ये संदर्भ क्र.२, ३ व ४ येथील शासन निर्णयांन्वये संरक्षित वनाचे लगतच्या क्षेत्रातील गावाचे सर्वसाधारण जातीच्या लाभार्थ्यांना कुकींग गॅस / बायोगॅस पुरवठा करण्याकरिता रु.६०१.९१ लक्ष इतका निधी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य नागपूर यांना वितरीत व खर्च करण्यास मान्यता प्रदान करण्यात आली होती.

३. सन २०१५-१६ करिता ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशिर्षांतर्गत एकूण रु.२०००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर असून रु.१४००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. तर ५० इतर खर्च या उद्दिष्टाअंतर्गत रु.९६२.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर असून त्याच्या ७० % मर्यादेत रु.६७३.४० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

४. सदरहू योजनेच्या अनुषंगाने सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरिता संरक्षित वनाचे लगत क्षेत्रातील गावाचे सर्वसाधारण जातीच्या लाभार्थ्यांना (अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीचे लाभार्थी वगळून) कुकींग गॅस / बायो गॅस पुरवठा करण्याकरिता ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशिर्षांतर्गत रु.१०८९.४० लक्ष इतके अनुदान मंजूर करण्याची विनंती अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य नागपूर यांनी संदर्भ क्र.६ वरील दि.०८.०७.२०१५ रोजीच्या पत्रान्वये शासनास केलेली आहे.

५. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ५ वरील दि.१७.०४.२०१५ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१५-१६ करिता योजनेत्तर व योजनांतर्गत योजनांकरिता प्रथम आठ महिन्याकरिता अर्थसंकल्पित निधीच्या ७० टक्के मर्यादेत रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करता येईल अशा सूचना दिलेल्या आहेत. त्याअनुषंगाने संरक्षित वनाचे लगत क्षेत्रातील सर्वसाधारण जातीच्या लाभार्थ्यांना (अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीचे लाभार्थी वगळून) कुकींग गॅस पुरवठा करणे या योजनेसाठी ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशीर्षाअंतर्गत ५०- इतर खर्च या उद्दिष्टाखाली अर्थसंकल्पीत नियतव्यय रु.६७३.४० लक्षच्या ७० टक्के मर्यादेत निधी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

६. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.६ वरील दि.०८.०७.२०१५ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केलेला प्रस्ताव तसेच वित्त विभागाने दि.१७.०४.२०१५ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना विचारात घेता, संरक्षित वनाचे लगत क्षेत्रातील सर्वसाधारण जातीच्या लाभार्थ्यांना (अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीचे लाभार्थी वगळून) कुकींग गॅस, बायो गॅस, दुभत्या जनावरांसाठी अनुदान व वृक्ष लागवडीच्या संरक्षणाकरिता अर्थसंकल्पीत निधीच्या ७० टक्के **मर्यादेत रु.४७१.३८ लक्ष (५० इतर खर्च) इतका निधी** प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना वितरीत करण्यास व बी.डी.एस. प्रणालीवर उपलब्ध केलेल्या अनुदानाच्या मर्यादेत खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

७. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वरील अनुदान खर्च करतांना खालील अटी व शर्ती यांची पूर्तता होईल याची दक्षता घ्यावी.

अ) उपरोक्त वितरीत केलेल्या निधीच्या मर्यादेत नवीन लाभार्थी निश्चित करुन त्यांचेकरिता अनुदानाचा विनियोग करावा.

ब) सदरहू योजनेतील लाभार्थी या विभागाच्या शासन निर्णय क्रमांक, महसूल व वन विभाग क्र.एफडीएम-२०१२/प्र.क्र.४/फ-२, दि. १०.०७.२०१२ व शासन शुध्दीपत्रक क्र. एफडीएम-२०१२/प्र.क्र.४/फ-२, दि.०८.०१.२०१३ मधील अटी व शर्तीनुसार असतील याची खात्री करावी.

क) सदरहू योजनेतील लाभार्थ्यांनी दिनांक.१०.०७.२०१२ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार एलपीजी कुकींग गॅस साठी व बायो गॅस साठी लाभार्थ्यांचा २५% हिस्सा दिल्याची खात्री करावी.

ड) सदर योजनेअंतर्गत वन विभागाकडून कोणतीही खरेदी करण्यात येणार नाही. ज्या लाभार्थ्यांनी एलपीजी गॅस साठी (२५%) व बायोगॅस साठी (२५%) त्यांचा हिस्सा दिल्यानंतर संबंधित वन विभागाचे उप वनसंरक्षक हे संबंधित योजनेबाबतचे अनुदान संयुक्त वन व्यवस्थापन समितीच्या बँक खात्यामध्ये टप्प्या टप्प्याने जमा करतील व संयुक्त वन व्यवस्थापन समिती लाभार्थीनिहाय सदरहू रक्कम संबंधित गॅस एजन्सीला देईल.

इ) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना वितरीत करण्यात येणा-या निधीचा विनियोग त्याच आर्थिक वर्षात होईल याची दक्षता घ्यावी.

फ) या योजनेअंतर्गत यापुर्वी वितरित केलेल्या निधीच्या अनुषंगाने सर्व जुने गॅस कनेक्शान व नवीन गॅस कनेक्शान आधार कार्ड बरोबर लिंक करण्याची कार्यवाही सर्व मुख्य वनसंरक्षक (प्रा.) / (वन्यजीव) यांनी दि.३०.०८.२०१५ पर्यंत पूर्ण करावी.

ग) सन २०१४-१५ मध्ये सदर योजनेअंतर्गत देण्यात आलेल्या लाभाच्या अनुषंगाने उपवनसंरक्षक / विभागीय वन अधिकारी यांनी प्रमाणित केलेली लाभार्थ्यांची यादी दि.३०.०७.२०१५ पर्यंत सादर करण्याच्या सूचना देखिल त्यांना देण्यात याव्यात.

८. उपरोक्त खर्च मागणी क्र.सी-७, प्रधानशीर्ष - २४०६, वनीकरण व वन्य जीवन, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना योजना, (११) (१०) ग्राम परिसर व आदिवासी विकास कार्यक्रम (२४०६ १५२१) या लेखाशीर्षाअंतर्गत ५०- इतर खर्च या उद्दिष्टाखाली सन २०१५-१६ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ वरील दि.१७.०४.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये आणि वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र/१००८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५.०५.२००९ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१७१६२५२१०९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.07.17 16:29:08 +05'30'

**(द.ल.थोरात)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) / (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक.
५) सर्व मुख्य वनसंक्षक (प्रादेशिक) / (वन्यजीव)
६) सर्व वनसंरक्षक / सर्व उप वनसंरक्षक (मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव) यांचेमार्फत)
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
९) वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन मंत्रालय, मुंबई.
१०) नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.
११) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
१२) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२